**अमृत या संस्थेसाठी पुणे महानगर पालिकेच्या अखत्यारीतील सयाजीराव गायकवाड उद्योग भवन येथे नव्याने सुरू करावयाच्या कार्यालयातील फर्निचर व विद्युत कामाच्या अंदाजपत्रकास मंजुरी मिळणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहूजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्र. अमृत २०२३/ प्र.क्र. ५१/ संस्था (अमृत),**
मंत्रालय (विस्तार), दालन क्र. १३९, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२
दि. ११.०७.२०२३

**संदर्भ:-** शासन परिपत्रक क्र. : संकीर्ण-२०१९/प्र.क्र. १०/इमा-२, दि. २५/९/२०१९

व्यवस्थापकीय संचालक, अमृत, पुणे यांचा दि. ५.०६.२०२३ रोजीचा प्रस्ताव.

**प्रस्तावना-** खुल्या प्रवर्गातील आर्थिक दृष्टया दुर्बल घटकांतील युवक-युवती व इतर उमेदवारांसाठी विविध उपक्रम, कार्यक्रम इ. राबविण्यात येऊन व इतर माध्यमातुनही विद्यार्थी, युवक-युवती, इत्यादींचा विकास घडविण्यासाठी महाराष्ट्र संशोधन, उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत) ही स्वायत्त संस्था स्थापन करण्यात आली आहे. अमृत या संस्थेच्या कार्यालयासाठी पुणे महानगरपालिकेच्या अखत्यारीतील सयाजीराव गायकवाड उद्योग भवन, पुणे येथील जागा भाडयाने घेण्यास तसेच सदर ठिकाणी कार्यालय सुरू करण्यासाठी आवश्यक असलेले फर्निचर, केबीन व विघुत संबंधित कामे करून घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

अमृत संस्थेस कार्यालयासाठी जागा अपूरी असल्याने पुणे महानगरपालिकेच्या अखत्यारितील सयाजीराव गायकवाड उद्योग भवन इमारतीतील ५ व्या मजल्यावरील गाळा क्र ५०१ ते ५०६ (एकूण क्षेत्रुफळ ७१०.७५ चौ. मी) जागा भाडयाने घेण्यास मान्यता देण्यात आली असून सदर जागेत अमृत या संस्थेचे कार्यालय सुरू करण्यासाठी आवश्यक असलेले फर्निचर, केबीन व विघुत संबंधित कामे करून घेण्यास अमृत व्दारे सार्व. बां. वि व सा. बां. वि (विद्युत) यांचेकडून प्राप्त होणा-या अंदाजपत्रकीय खर्चास दि. १९/४/२०२३ रोजी पार पडलेल्या अमत संस्थेच्या बोर्ड ऑफ गर्व्हनरन्सच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने संस्थेकडून रु. ३,२०,७६,२६०/इतका अदांजीत खर्चाचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला होता.

**०२. अमृत संस्थेच्या कार्यालयीन फर्णिचर** खरेदी संबंधीत बाबीकरीता, ई निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग उर्जा व कामगार विभागाच्या दि.२४.०८.२०१७ व सा.बां. विभागाच्या दि. २५ सप्टेंबर २०१९ च्या नमूद सूचनांचा अमंलबजावणी करण्याच्या अटीवर तसेच मुख्य अभियंता स्थापत्य व मुख्य अभियंता विद्युत यांनी दिलेल्या Reacapulation Sheet आधारे अमृत या संस्थेसाठी पुणे महानगर पालिकेच्या अखत्यारीतील सयाजीराव गायकवाड उद्योग भवन, पुणे येथे नव्याने सुरु करावयाच्या कार्यालयातील फर्निचर, केबीन व विद्युत कामाच्या उपरोक्त नमूद अंदाजपत्रकीय खर्च रु. ३,२०,००,०००/- (अक्षरी रु. तीन कोटी वीस लाख फक्त ) इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

३. **शासन निर्णय, वित्त विभाग क्र विअप्र**-२०१३/**प्र.क्र.**३०/१३/**विनियम, भाग**-२,**दि**.१७.०४.२०१५ **सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तीका,** १९७८ **भाग पहिला, उपविभाग-पाच, अ क्र.**१ **महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परिच्छेद क्र.** १३४ **अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारन्वये खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

- क. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदी बाबत काम करतेवेळी विस्तृत अदांजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
- ख. नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुनच कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.
- ग. प्रस्तावातील खरेदी संबंधी बाबीकरीता ई निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग उर्जा व कामगार विभागाच्यादि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये सूचना विचारात घ्याव्यात.
- घ. विषयांकित कामा करिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही या दृष्टीने
  विशेष दक्षता घेवून काम करण्यात यावे.
- ङ. काम करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी. तसेच जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खातरजमा व्यवस्थापकीय संचालक,अमृत यांनी करावी.

**०४.** सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च सन २०२३-२४ या वर्षातील उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२३०७१३१४५७२८८९३४ असा. आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by DINESH ROHIDAS CHAVAN
Date: 2023.07.13 15:00:56 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. व्यवस्थापकीय संचालक, अमृत संस्था, पुणे
२. मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. निवडनस्ती (संस्था)